**पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अखत्यारितील पोलीस विभागाच्या निवासी व अनिवासी इमारतींच्या दुरुस्तीसाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. पोप्रमा - ०११७/प्र.क्र. ८० / पोल-७,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ३१ मार्च, २०१७.

<u>वाचा</u> :- १) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/कक्ष१४/अर्थसं-१/संजना/ ४५/१७, दि. ३१.०३.२०१७.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. पोप्रमा- ०११७/ प्र.क्र.८०/ पोल-७, दि.३१.०३.२०१७.

**<u>प्रस्तावना:-</u>**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अखत्यारितील पोलीस निवासी व कार्यालयीन इमारतींची दुरुस्ती करण्यासाठीच्या प्रस्तावांसाठी सन २०१६-१७ साठी अन्य उद्दिष्टांमधून पुनर्वाटप करण्यात आलेला रु.२,८१,६४,०००/- (रुपये दोन कोटी एक्याऐंशी लक्ष चौसष्ट हजार फक्त) इतका निधी महाराष्ट्र पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाकडे जमा करण्यास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदरहू निधी सन २०१६-२०१७ मध्ये दुरुस्तीच्या कामांसाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अखत्यारितील पोलीस निवासी व अनिवासी इमारतीच्या दुरुस्तीसाठी प्रकल्पनिहाय निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन असल्याने त्याबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे :-

**<u>शासन निर्णय:-</u>**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अखत्यारितील पोलीस विभागाच्या निवासी व अनिवासी इमारतींच्या दुरुस्तीसाठी प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांना सोबत जोडलेल्या विवरण पत्र “अ” मध्ये नमूद केल्याप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा निधी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई/ व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई यांनी संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांना उपलब्ध करुन देण्यात यावा. ज्या कामांना निधी उपलब्ध करुन दिलेला आहे अशा दुरुस्तीच्या कामांची पाहणी संयुक्तपणे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित अधिकाऱ्यांसमवेत पोलीस अधीक्षक/ अपर पोलीस अधीक्षक दर्जाच्या अधिकाऱ्यांकडून करण्यात यावी. तसेच दुरुस्तीची कामे समाधानकारकरित्या करण्यात आल्याचे प्रमाणपत्र संबंधित घटक प्रमुख यांनी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई/ पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना सादर करावे.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेताक २०१७०५०५१५५६४११३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.05.05 16:00:22 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या, वरळी, मुंबई.
३. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
४. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
६. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
७. वित्त विभाग, (व्यय-७,/ अर्थ-११/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई.
८. गृह विभाग, (बीयुडी-१/ बीयुडी-२) मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-७).

## विवरणपत्र "अ"

## पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अखत्यारितील इमारतींच्या दुरुस्तीसाठी निधी उपलब्ध करुन देणेबाबत

| अ.क्र. | प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांचा तपशिल | गृह विभाग, ज्ञापन क्रमांक व दिनांक | अंदाजपत्रकीय रक्कम (रुपये) | वितरीत करावयाचा निधी (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १. | पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिकारक्षेत्रातील पोलीस लाईन, शिवडी, येथील निवासी इमारतींची दुरुस्ती करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत | पोप्रमा-०३१७/प्र.क्र.२३७/ पोल-७. दिनांक ३१.०३.२०१७ | रु.६,१४,०९,२५०/- | रु.१,९०,६५,१९६/- |
| २. | पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाच्या आवारातील विस्तार इमारत-३ (अनेक्स-३) पाडून टाकण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत. | दुरुस्ती-०११७/प्र.क्र.८८/ पोल-७. दिनांक ३०.०३.२०१७ | रू.५०,९८,८०४/- | रू.५०,९८,८०४/- |
| ३. | पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिकारक्षेत्रातील बोरीवली, गोरेगांव, कांदीवली व मालाड, मुंबई येथील पोलीस निवासस्थानांमध्ये विद्युतविषयक काम करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत | दुरुस्ती-०३१७/प्र.क्र.२०९/ पोल-७. दिनांक ३०.०३.२०१७ | रू.९८,६३,८१६/- | रु.४०,००,०००/- |
| | **एकूण** | | | **रु.२,८१,६४,०००/-** |